**सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" यांचा परिविक्षाधीन कालावधी संपुष्टात आणण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- डीपीपी-०११७/प्र.क्र.१८/पोल-१०,**
२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा रागुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ५ जून, २०१८

वाचा :- १) शासन आदेश, गृह विभाग, क्रमांक डीपीपी२०१२/प्र.क्र.१३५/पोल-१०, दिनांक ३०.०१.२०१३, दिनांक ३०.०३.२०१३
२) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक:-सअआस्था/८९/१११/२०१७, दिनांक १३.०१.२०१७
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:- परिवी-२७१५/ प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९.०२.२०१६
४) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक:-सअआस्था/८९/६०९/२०१८, दिनांक १३.०३.२०१८ व क्रमांक:-सअआस्था/८९/६०८/२०१८, दिनांक १३.०३.२०१८

प्रस्तावना :-

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचा आस्थापनेवरील सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार खाली नमुद अधिकाऱ्यांची सन २०१३ च्या उपरोक्त संदर्भाधीन शासन आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली होती. या सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण झाल्याने तो संपुष्टात आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचा आस्थापनेवरील सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार खाली नमुद अधिकाऱ्यांची सन २०१३ च्या संदर्भाधीन शासन आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली होती. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या संदर्भाधीन पत्र क्रमांक २ व ४ अन्वये सदर सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासंबंधीचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता.

खालील नमूद सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" यांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक असल्याने त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या दिनांकापासून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यात येत आहे. :-

| अ. क्र. १. | नांव २ | रुजू होण्याचा दिनांक ३ | परिविक्षाधीन कालावधीत उपभोगलेली अर्जित/वैद्यकीय रजा ४ | परिविक्षाधीन कालावधी समाप्तीचा दिनांक ५ |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. शैलेंद्र जालंदर बागडे | ०४.०६.२०१३ | अर्जित रजा - ११<br>वैद्यकीय रजा - ०० | १४.०६.२०१५ |
| २. | श्रीमती सीमा श्रीप्राद देशपांडे | ०५.०२.२०१३ | अर्जित रजा - ०९<br>प्रसुती रजा - १८० | १४.०८.२०१५ |

सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दिनांक २९.०२.२०१६ मधील तरतूदीनुसार उपरोक्त नमूद परिवीक्षाधीन कालावधी हा कोणत्याही स्वरुपातील रजा (नैमित्तीक रजा वगळून) रजा उपभोगल्यास त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी रजेच्या कालावधी एवढा वाढविण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६०५१५५०१४८१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2018.06.05 15:52:31 +05'30'

**( दिनेश आ. सस्ते )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, अभियोग संचालनालय, खेतान भवन, ५ वा मजला, सदनिका क्रमांक ८, चर्चगेट, मुंबई ४०० ०२१.
२. महालेखापाल (लेखा व परीक्षा) - १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४. अधिदान लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६. संबंधित सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" यांना संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे मार्फत.
७. निवड नस्ती/पोल-१०.